वितरण आदेश क्र.३

**२०१६-२०१७ या आर्थिक वर्षात जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन मधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते भागविण्याकरीता अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जिग्राप्र-२०१६/प्र.क्र-६९/योजना-५**

बांधकाम भवन इमारत,तळमजला
२५,मर्झबान पथ, फोर्ट,मुंबई-४०० ००१.
दिनांक : १७ जानेवारी,२०१७

**वाचा :**

१) केंद्र शासनाचे आदेश क्रमांक : १७०१४/१/२०१६-१७/DRDA(SI.No.१४), दिनांक : १० जुन, २०१६.
२) केंद्र शासनाचे आदेश क्रमांक : १७०१४/१४/२०१६-१७/DRDA(SI.No.६३), दिनांक ७ नोव्हेंबर,२०१६
३) केंद्र शासनाचे आदेश क्रमांक : १७०१४/१४/२०१६-१७/DRDA(SI.No.७२), दिनांक २६ डिसेंबर,२०१६
४) शासन निर्णय क्रमांक : जिग्राप्र-२०१६/प्र.क्र.६९/योजना-५, दिनांक ४ जुलै,२०१६.
५) शासन निर्णय क्रमांक : जिग्राप्र-२०१६/प्र.क्र.६९/योजना-५, दिनांक ६ डिसेंबर,२०१६.

**प्रस्तावना :**

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन ६०:४० अशी केंद्र पुरस्कृत योजना असून, या योजनेंतर्गत केंद्र शासनाचा ६०% हिश्याचा निधी थेट जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी प्राप्त होणारा हिस्सा राज्याच्या अर्थसंकल्पात दर्शवून त्याचे वितरण सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना करण्याचे केंद्र शासनाचे निदेश आहेत. राज्य समरुप हिस्सा ४०% नियोजन विभागामार्फत जिल्हा नियोजन विकास समिती मार्फत जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडे वितरीत करण्याची प्रचलित पध्दत यापुढे देखील सुरु ठेवण्याचे नियोजन व वित्त विभागाने त्यास मान्यता दिली आहे.

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांमधील अधिकारी व कर्मचारी यांच्या वेतन व भत्त्यासाठी केंद्र शासनाच्या हिश्श्याची तरतूद राज्याच्या अर्थसंकल्पात ग्राम विकास व जलसंधारण विभाग मागणी क्र.एल-३, २५०१-ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, ०१-एकात्मिकृत ग्राम विकास कार्यक्रम, ००१-संचालन व प्रशासन, (००) गट पातळीवरील यंत्रणा अधिक बळकट करणे, (००)(०३) जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन (योजनांतर्गत), (६०% केंद्र पुरस्कृत योजना), ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (केंद्र हिस्सा), (२५०१ २९१७) या

लेखाशिर्षाखाली २०१६-२०१७ आर्थिक वर्षासाठी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन मधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते भागविण्याकरीता रुपये ३५५३.८६ लक्ष एवढा निधी अर्थसंकल्पित केला आहे.

## शासन निर्णय :

शासन निर्णय समक्रमांक, दिनांक ४ जुलै,२०१६ अन्वये केंद्र शासनाकडून पहिला हप्ता म्हणून प्राप्त झालेला केंद्र हिस्सा रुपये ६,३५,१९,०००/- (रुपये सहा कोटी, पस्तीस लक्ष, एकोणीस हजार फक्त) इतका निधी व शासन निर्णय समक्रमांक, दिनांक ६ डिसेंबर, २०१६ अन्वये केंद्र शासनाकडून दुसऱ्या हप्त्यातील पहिला टप्पा म्हणून प्राप्त झालेला केंद्र रुपये २६,४१,०००/- (रुपय सव्वीस लक्ष, एकेचाळीस हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीमार्फत (बी.डी.एस.) संबंधित जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे.

२. ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांचे आदेश क्र.१७०१४/१४/२०१६-१७ /DRDA (Sl.No.७२), दिनांक २६ डिसेंबर,२०१६ अन्वये जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणामधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते अदा करण्याकरीता केंद्र शासनाकडून (६०% केंद्र पुरस्कत योजना) या योजनेंतर्गत अनुदानाचा दुसरा हप्त्यातील दुसरा टप्पा म्हणून केंद्र हिस्सा रुपये २,७२,२२,०००/- (रुपये दोन कोटी, बाहत्तर लक्ष, बावीस हजार फक्त) इतके अनुदान प्राप्त झाले असून, सदर निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (बी.डी.एस.) वर उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे.

३. सदर रकमा संबंधीत जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहेत. २०१६-२०१७ या आर्थिक वर्षासाठी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन मधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते भागविण्याकरीता रुपये २,७२,२२,०००/- (रुपये दोन कोटी, बाहत्तर लक्ष, बावीस हजार फक्त) दुसरा हप्त्यातील दुसरा टप्पा इतके अनुदान वितरीत करण्यात येत आहे. सदर खर्च ग्राम विकास व जलसंधारण विभाग मागणी क्र.एल-३, २५०१-ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, ०१-एकात्मीकृत ग्राम विकास कार्यक्रम, ००१-संचालन व प्रशासन, (००) गट पातळीवरील यंत्रणा अधिक बळकट करणे, (००)(०३) जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन (योजनांतर्गत), (६०% केंद्र पुरस्कृत योजना), ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (केंद्र हिस्सा), (२५०१ २९१७) या लेखाशिर्षाखाली सन २०१६-२०१७ च्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे, अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अंमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी. तसेच सदर निधी खर्च न झाल्यास संबंधित अधिकाऱ्यास जबाबदार धरण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीव्दारे (B.D.S.) वितरीत करण्यात येत आहे.

६. सदरहु अनुदान कोषागारातून काढल्यानंतर प्रकल्प संचालकांनी पुढील माहिती- १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक त्वरित लेखाधिकारी, कार्यासन क्र.योजना-२, बांधकाम भवन, २५-मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१ यांच्याकडे पाठवावी.

७. सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन मधील अधिकारी व कर्मचारी यांच्या रिक्त पदांची अद्ययावत माहिती विहीत प्रपत्रात शासनास दरमहा खर्चाच्या मासिक अहवालासोबत पाठविणे अनिवार्य आहे.

८. सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन मधील अधिकारी व कर्मचारी यांच्या रिक्त पदांची माहिती केंद्र शासनाच्या www.rural.nic.in या संकेतस्थळावर दरमहा अद्ययावत करुन त्याची प्रत शासनास पाठविण्यात यावी.

९. सदर निधी खर्च झाल्याचा उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत शासनास पाठविण्यात यावी.

१०. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १७ एप्रिल,२०१५ च्या शासन परिपत्रका- मधील तपासणी सूचीतील अटी व परिच्छेद ७ ते ८ मधील अटीच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सोबत :- जिल्हानिहाय विवरण पत्र जोडले आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत-स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११७१०२४२०१८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arunkumar S Pawar

Digitally signed by Arunkumar S Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arunkumar S Pawar
Date: 2017.01.20 12:41:04 +05'30'

**(अरुण शं.पवार)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालये (सर्व)
२. महालेखापाल (लेखापरिक्षा) व (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१,मुंबई.
३. महालेखापाल (लेखापरिक्षा) व (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२,नागपूर.
४. संचालक, लेखा व कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. संचालक, निवासी व लेखा कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व).

७. उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालये (सर्व)
८. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व).
९. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
१०.मुख्य लेखापरिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
११.वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई.
१२.वरिष्ठ लेखाधिकारी, शासनस्तर अंतर्गत लेखा परिक्षण पथक, बांधकाम भवन, मुंबई.
१३.कक्ष अधिकारी, (योजना-१/२/३/४/५/६/७/८/९/१०), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, मुंबई-०१.
१४.कक्ष अधिकारी, (वित्त-१/२/३/४/५/६/७/८/९) ग्रामविकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, मुंबई-०१.
१५. निवडनस्ती (कार्यासन-योजना-५).

**शासन निर्णय क्र.जिग्राप्र-२०१६/प्र.क्र-६९/योजना-५, दिनांक १७ जानेवारी,२०१७ सोबतचे विवरण पत्र.**

(रुपये लाखात)

| अ.क्र. | जिल्हा | वेतन व भत्ते (पहिला हप्ता) |
|---|---|---|
| १. | अकोला | १७.७८ |
| २. | चंद्रपूर | २०.२६ |
| ३. | धुळे | १४.३५ |
| ४. | हिंगोली | १४.३५ |
| ५. | जालना | १७.७८ |
| ६. | लातूर | १७.७८ |
| ७. | नांदेड | २०.९० |
| ८. | परभणी | १७.७८ |
| ९. | पुणे | १४.०० |
| १०. | रायगड | ०.०० |
| ११. | सांगली | १७.७८ |
| १२. | सिंधुदुर्ग | १७.७८ |
| १३. | यवतमाळ | २०.९० |
| १४. | बुलढाणा | २०.२६ |
| १५. | अमरावती | २०.२६ |
| १६. | नागपूर | २०.२६ |
| | **एकूण** | **२७२.२२** |

(रुपये दोन कोटी, बाहत्तर लक्ष, बावीस हजार फक्त)

Arunkumar S Pawar

Digitally signed by Arunkumar S Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arunkumar S Pawar
Date: 2017.01.20 12:41:52 +05'30'

**अरुण शं.पवार**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन